राष्ट्रसंत तुकडोजी श्रीक्षेत्र मोझरी, जिल्हा अमरावती, येथे
मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी विकास आराखडा
निधी वितरीत करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०२०/प्र.क्र.४७/का.१४४४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २२ मे, २०२०.

**वाचा -**

नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.०३/का.१४४४,
दिनांक २१ फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :-**

वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या जन्मतिथीस १०० वर्ष पूर्ण झाल्याच्या प्रित्यर्थ श्रीक्षेत्र मोझरी, जिल्हा अमरावती विकास कामाकरिता दिनांक २१ फेब्रुवारी, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सुधारीत आराखड्यातील ₹ १५०.८३ कोटी किमतीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. या आराखड्याकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रसंत तुकडोजी श्रीक्षेत्र मोझरी, जिल्हा अमरावती, येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या आराखड्यातील कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना सन २०२०-२१ मध्ये रु.२,६०,०००/- (रु. दोन लाख साठ हजार फक्त) इतका निधी पुढीलप्रमाणे वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप पुढीलप्रमाणे आहे.:-

| मुख्य लेखाशिर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित निधी | दि. ११ मे, २०२० च्या शासन निर्णयान्वये वितरित निधी | या शासन निर्णयान्वये वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| ३४५२२७२२ | ०१, वेतन | २६,००,०००/- | २,६०,०००/- | २,६०,०००/- |

२. सदरहू खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र.ओ-८, मुख्य लेखाशिर्ष ३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनसाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००)(०२) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज गुरुकुंज आश्रम, अमरावती, विकास विशेष कृती कार्यक्रम (३४५२ २७२२) योजनातंर्गत (दत्तमत)” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. उपरोक्त नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत सन २०२०-२१ मध्ये झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्यात यावा. तसेच वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५२२१६४००९७६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

(विद्या हम्पय्या)
उपसचिव.

प्रत तातडीच्या कार्यवाहीसाठी,
विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती,

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. राज्यमंत्री उद्योग व खणीकर्म, व पर्यावरण तथा पालकमंत्री,(अमरावती) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य,
८) मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,
११) जिल्हाधिकारी, अमरावती,
१२) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई,
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
१४) उप सचिव, का.१४२४, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.